**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ अनुसार अधिसूचित करण्यात आलेल्या सर्व ऑनलाईन लोकसेवा "आपले सरकार" या पोर्टलवरुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः आरटीएस - २०१९/प्र.क्र.११/१८ (र.व का.)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७ फेब्रुवारी, २०१९.

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण-२०१५ / प्र. क्र. १२३ /१८ (र. व का.), दिनांक २८ सप्टेंबर, २०१५.

**परिपत्रक :**

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ अंतर्गत प्रत्येक सार्वजनिक प्राधिकरणांकडून अधिसूचित करण्यात आलेल्या लोकसेवा ऑनलाईन प्राप्त करून घेण्यासाठी नागरिकांना वेगवेगळ्या संकेतस्थळांवर जावे लागते. त्यामुळे अशाप्रकारे विविध संकेतस्थळांवर न जाता एकाच ठिकाणी सर्व प्राधिकरणांकडून दिल्या जाणाऱ्या सेवा मिळाव्यात या हेतूने **"आपले सरकार"** हे पोर्टल विकसित करण्यात आले आहे. त्यामुळे सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी **"आपले सरकार"** हया पोर्टलवरूनच त्यांच्या ऑनलाईन सेवा देणे अपेक्षित आहे. तथापि राज्य सेवा हक्क आयोगासमोर दाखल झालेल्या एका अपिल प्रकरणी अद्यापही काही शासकीय प्राधिकरणे त्यांच्या स्वतंत्र संकेतस्थळावर अर्ज केल्यावरच अपेक्षित सेवा मिळू शकते अशी भूमिका घेत असल्याचे आयोगाच्या निदर्शनास आले असून ही बाब शासनाच्या धोरणाशी पूर्णपणे विसंगत आहे.

२. सबब सर्व सार्वजनिक प्राधिकरणांना सूचित करण्यात येते की, त्यांनी उक्त अधिनियमांतर्गत अधिसूचित केलेल्या लोकसेवा ऑनलाईन देताना त्या **"आपले सरकार"** या पोर्टलमार्फत देण्यात येतील, याची दक्षता घ्यावी. तसेच सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांचे नियंत्रणाखालील सर्व सार्वजनिक प्राधिकरण सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करीत असल्याबाबत खातरजमा करावी.

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०२०८११२५५२२३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Samridhi V. Angolkar
Date: 2019.02.08 11:27:52 +05'30'

**( समृद्धी अनगोळकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,

२.सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
३.मा. राज्यपालांचे सचिव (५ प्रती),
४.मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
५.मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव (५ प्रती),
६.मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
७.मा.मुख्य सचिवांचे कार्यालय,
८.मा.महाअधिवक्ता,महाराष्ट्र राज्य
९.सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
१०.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती),
११.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१२.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
१३.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय (२ प्रती),
१४.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१५.सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१६.मुख्य माहिती आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१७. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१८.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,
१९.सर्व मंत्रालयीन विभाग
२०.सर्व विभागीय आयुक्त,
२१.सर्व जिल्हाधिकारी,
२२.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३.मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
२४.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२५.निवड नस्ती.(कार्यासन-१८)